वैधानिक विकास मंडळ निहाय अनिवार्य प्रत्यक्ष खर्च हा अविभाज्य भागासह विधानमंडळास सादर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र. ८/अर्थ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- ३१ जानेवारी, २०२०.**

**वाचा:- शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक :- संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४/अर्थ-१, दि. ०८ मे, २०१४.**

**परिपत्रक**

वैधानिक विकास मंडळ निहाय अनिवार्य प्रत्यक्ष खर्च हा अविभाज्य भागासह विधानमंडळास सादर करणे आवश्यक आहे. या अर्थसंकल्पीय अधिवेशनामध्ये ज्या वित्तीय वर्षाचा अर्थसंकल्प मांडण्यात येईल त्या वित्तीय वर्षाच्या लगतचे वर्ष सोडून त्यापूर्वीच्या वर्षाची वैधानिक विकास मंडळ निहाय अनिवार्य प्रत्यक्ष खर्चाची माहिती (अविभाज्य भागासह) विधानमंडळास सादर करणे आवश्यक आहे. सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या विभागाशी संबंधित वैधानिक विकास मंडळ निहाय अनिवार्य प्रत्यक्ष खर्चाची माहिती विभाग निहाय (उपविभाग निहाय सादर न करता) म्हणजे अर्थसंकल्पीय (White Book) पुस्तकानुसार एकाच नमुन्यात व अर्थसंकल्पावरील सर्वसाधारण चर्चेपूर्वी स्वतंत्ररित्या (कार्यक्रम अंदाजपत्रकात न दर्शविता स्वतंत्रपणे) सभागृहाच्या पटलावर सादर करणे आवश्यक असल्याच्या सूचना वर नमूद दि. ०८ मे, २०१४ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत.

३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सन २०२०-२१चे अर्थसंकल्पीय अधिवेशन दि. २४ फ़ेब्रुवारी, २०२० पासून सुरु होत आहे. या अधिवेशनामध्ये राज्याचा अर्थसंकल्प दि. ०५ मार्च, २०२० रोजी विधानमंडळास सादर करण्यात येणार आहे. ही बाब विचारात घेता, संदर्भाधिन परिपत्रकास अनुसरुन या पत्राद्वारे सर्व संबंधित प्रशासकीय विभागांना सूचित करण्यात येते की, या अर्थसंकल्पीय अधिवेशनामध्ये ज्या वित्तीय वर्षाचा अर्थसंकल्प मांडण्यात येईल त्या वित्तीय वर्षाच्या लगतचे वर्ष सोडून त्यापूर्वीच्या वर्षाचा म्हणजेच सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाचा वैधानिक विकास मंडळ निहाय अनिवार्य प्रत्यक्ष खर्च हा अविभाज्य भागासह विहित कालावधीत विधानमंडळास सादर करण्याची सर्वस्वी जबाबदारी सर्व प्रशासकीय विभागाची राहील याची कृपया नोंद घ्यावी.

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००२०११२०९३९८१०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant K. Patil

Digitally signed by Vasant K. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=56462e610dbf070fe5eefa98886b167556f80b37318 1ed680e4c9c879d7e3617, serialNumber=14caf70544d4d2fb25d1da6ed673b0488e940 d807179c09470fcdd9192ba4ce7, cn=Vasant K. Patil
Date: 2020.02.01 11:49:22 +05'30'

( व. कृ. पाटील )
**सह सचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
३) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४) सर्व सहसचिव/उपसचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
५) संचालक, मुद्रण व लेखन सामुग्री संचालनालय, चर्नी रोड, मुंबई.
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

८) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१२) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३) स्वीय सहाय्यक, मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती, अर्थसंकल्प-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.